महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास खरेदी अनुदान मंजुर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आविम २०१६/प्र.क्र.१४९/का-३**

मादाम कामा रोड,हतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०१७

**वाचा :-** १) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र.-टिडीसी-१०८७ / प्र.क्र. ८४/का.३, दि. २/६/१९८७

२) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र. टिडीसी - १०९१ / प्र. क्र. ३०१९ / का. ३, दि. ५ /०५ /१९९७

३) आदिवासी विकास महामंडळाचे पत्र क्र. आविम /विप / खरेदी अनुदान /११६७ /१७ दि. जानेवारी १७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांच्यामार्फत राबविण्यात येणा-या एकाधिकार खरेदी योजनेतंर्गत कृषी उपज व वनोपज खरेदीसाठी होणा-या व्यापारी खर्चापोटी शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र. टिडीसी-१०९१/प्र.क्र.३०१९/का.३, दि. ५/५/१९९७ अन्वये प्रति क्विंटल रू.११.७५ प्रमाणे खरेदी अनुदान शासनाकडून देण्यात येत.त्यानूसार आदिवासी विकास महामंडळाला त्या त्या वर्षाचे लेखापिरक्षण पूर्ण होईपर्यत एकूण देय खरेदी अनूदानाच्य ८०% इतकी रक्कम व लेखा परिक्षण पूर्ण झाल्यानंतर उर्वरित २०% रक्कम मंजुर करण्यात येते. सन २०१३-१४ ते सन २०१५-१६ या कालावधीत एकुण ६२३७८१.८० क्विंटल कृषी उपज व वनोपज खरेदी करण्यात आली आहे. लेखा परिक्षण झालेले व लेखा परिक्षण होणार असलेली अशी १००% व ८०% नुसार अनुज्ञेय असलेली रक्कम रु.५४,९९,७६३/- वितरित कृषी उपज व वनोपजकरिता खरेदी अनुदान मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

## शासन निर्णय :-

शासन अधिसूचना दि.१९/१०/२०१३ अन्वये ८ जिल्हयातील २९ तालुक्यात एकाधिकार खरेदी योजना महामंडळामार्फत सुरू करण्यात आलेली आहे. महामंडळाने हंगाम २०१३-१४ ते सन २०१५-१६ मध्ये एकूण ६२३७८१.८० क्विंटल कृषी उपज व वनोपज खरेदी केले आहे. सदर खरेदीवर महामंडळास प्रति क्विंटल रू.११.७५ प्रमाणे रू. ७३,२९,४३६.०० इतके खरेदी अनुदान देय ठरते. तथापि, शासन निर्णय दि.५/५/१९९७ मधील तरतुदीनुसार सन २०१३-१४ चे लेखा परिक्षण झाले असल्याने या हंगामातील देय १००% रक्कम रु. २३,२८,२५८.०० व सन २०१४-१५ ते सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाचे लेखा परिक्षण झालेले नसल्याने महामंडळास ८०% प्रमाणे देय असलेली रू. ३१,७१,५०५.०० अशी एकुण रु. ५४,९९,७६३ एवढी रक्कम खरेदी अनुदान म्हणुन वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. आयुक्त, आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी सदरहू रक्कम रू.५४,९९,७६३.०० एवढी रक्कम कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.., नाशिक यांना अदा करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर खर्च हा "मागणी क्र.टी-५, लेखाशिर्ष २४२५ सहकार,पंचवार्षिक योजनेतंर्गत योजना-७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना-(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१)(०८) महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळास वित्तीय सहाय्य (२४२५ ०८५३)३३ अर्थसहाय्य" या लेखाशीर्षखाली खर्ची टाकावा व सन २०१६-१७ साठी करण्यात आलेल्या मंजुर तरतूदीतून भागावावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०७१७१६२६१८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhikan Thakur

Digitally signed by Bhikan Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7b2c9dcf450d0b904c114bda838cde685bef168cb7e8459d91bff665f705c3ea, cn=Bhikan Thakur
Date: 2017.03.07 17:18:03 +05'30'

**(बी. ओ. ठाकुर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य,नाशिक
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.,नाशिक
३. सहकार आयुक्त तथा निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे.
४. सहनिबंधक सहकारी संस्था, आदिवासी विकास,नाशिक.
५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२,मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
८. वित्त विभाग (व्यय-१४/साऊ), मंत्रालय,मुंबई.३२
९. संचालक,लेखापरिक्षा,ऑफिस ऑफ दि डायरेक्टर सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट,१०१,महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
१०. कक्ष अधिकारी (का-६),आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.- पुढील योग्यती कार्यवाहीस्तव अग्रेषित.
११. निवडनस्ती,का-३, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२